राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम सल्लागाराने केलेल्या कामाची रक्कम अदा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग.
शासन निर्णय क्र. राभुअ-२०१०/(प्र.क्र.१५९/१०)/ल-१ सेल.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ७ फेब्रुवारी, २०११.

वाचा :- १. शासन निर्णय क्रमांक सीएलआर-२००९/प्र.क्र.१५/ल-१ सेल, दिनांक ७/९/२०१०.
२. जमाबंदी आयुक्त व संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडील पत्र क्र. एनएलआरएमपी ४९/स-१/२०१०, दि. २३.११.२०१०.

**प्रस्तावना:-** केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाकडून सुरु करण्यात आलेला राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम राज्यातील पुणे, सिंधुदुर्ग, नाशिक, लातूर, बुलढाणा व नागपूर या सहा जिल्हयात सुरु करण्यात आलेला आहे. या कार्यक्रमांअंतर्गत तालुका स्तरावरील दुय्यम निबंधक कार्यालयाची तहसिलदार कार्यालय व भूमि अभिलेख कार्यालय यांची जोडणी करणे, जुन्या अभिलेखांचे स्कॅनिंग व आधुनिक भूमि अभिलेख कक्ष तयार करणे, नकाशाचे स्कॅनिंग व डिजीटायझेशन करणे इ. कामे पार पाडली जाणार आहेत. या कार्यक्रमांची राज्यात अंमलबजावणी करण्यासाठी राज्य स्तरीय नियंत्रण व पुनर्विलोकन समिती तसेच उच्चाधिकार समितीच्या बैठकीत या कामाकरिता सल्लागार नेमण्याचा निर्णय झाला आहे.

२. याकरिता शासनाने माहिती व तंत्रज्ञान विभागाकडे ई - गव्हर्नंस या कामासाठी नोंदणीकृत असलेल्या मे. प्राईस वॉटर कुपर्स प्रा.लि., गुरगांव, हरयाणा या संस्थेची सल्लागार म्हणून दिनांक ७/९/२०१० च्या शासन निर्णयान्वये म्हणून नियुक्ती केलेली आहे.

३. त्यानुसार सल्लगार यांचे समवेत केलेल्या करारनाम्यातील अटींप्रमाणे, त्यांनी काम केले असून याकरिता जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य), पुणे यांचेकडे खालील निधी सुपूर्द करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | हिस्सा | | लेखाशिर्ष | मंजूर अनुदानातून वितरीत करावयाची रक्कम रुपये |
|---|---|---|---|---|---|
| | | केंद्र | राज्य | | |
| १ | राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमांअतर्गत सल्लागाराने केलेल्या कामाची रक्कम अदा करणे. | | ५०% | २०२९ जमीन महसूल (००) (०६), जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे (२०२९ ०८१४) राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम (रा.भू.अ.आ.का.) ५०% केंद्र पुरस्कृत योजना (५०% राज्य हिस्सा) १३ कार्यालयीन खर्च. | ३,२२,४९५/- |
| | एकूण | | | | ३,२२,४९५/- |

३. शासन निर्णय क्र. एसयूपी-२००९/प्र.क्र.६०/ब-१, दि.२.७.२००९ अन्वये नियंत्रण अधिकारी म्हणून जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य) पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. उपरोक्त बाबींवर होणारा खर्च मागणी क्र. २०२९ जमीन महसूल (००) (०६) जमाबंदी आयुक्त भूमि (म.रा.) पुणे (२०२९ ०८१४) राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम (रा.भू.अ.आ.का.) ५०% केंद्र पुरस्कृत योजना (५०% राज्य हिस्सा) १३ कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ मध्ये खर्ची टाकण्यात यावा.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९/११/व्यय १०, दिनांक १८.०१.२०११ अन्वये त्यांच्या सहमतीने व मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या वेब साईटवर प्रसिध्द केला असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक हा आहे..

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सं.ध.तवरेज )
अवर सचिव,
महसूल व वन विभाग.

प्रत :-

१. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल १ व २ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६. कोषागार अधिकारी, जिल्हा पुणे,
७. ल-१ सेल कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.